पर्यटन विभागांतर्गत नस्ती सादरीकरणाचे स्तर/टप्पे कमी करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**मादाम कामा रोड, हुतात्मा चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,**
**शासन परिपत्रक क्र.टीडीसी २०२५/०४/प्र.क्र.६३/पर्यटन-१,**
**दिनांक : २५ एप्रिल, २०२५**

वाचा :-१. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक.एसआरव्ही-२००४/प्र.क्र.१५ /०४/१२, दिनांक २५.०५.२००६

२. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक.पीडीओ-१००७/प्र.क्र.९/१८ (र.व.का.) दिनांक १४.११.२०१३

३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक मुसका-२०११/५४/का-२०१, दिनांक ११.०२ २०११.

शासकीय कार्यालयात पारदर्शकता व गतीमानता आणण्याच्या दृष्टीने "महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५" हा राज्यात लागू करण्यात आला असून, अधिनियमातील प्रकरण ३ करिता "शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम २०१३" दिनांक १४ नोव्हेंबर, २०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्यात लागू करण्यात आले आहेत. अधिनियम २००५ च्या कलम ९ व नियम २०१३ च्या क्र. ६ नुसार विभागात हाताळण्यात येणाऱ्या विविध विषयांचे स्वरुप, स्तर आणि महत्व विचारात घेऊन विभागाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने त्या सादर करण्यासाठी अधिकारांचा स्तर निर्धारित करण्याचे निदेश दिले आहेत. तसेच, सामान्य प्रशासन विभागाने दिनांक ११/०२/२०११ च्या परिपत्रकान्वये मंत्रालयीन विभागांतर्गत **सादरीकरणाचे टप्पे कमी करणे, अधिकारांचे विकेंद्रीकरण** बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.

०२. त्यानुषंगाने पर्यटन विभागातील सर्व कार्यासनाशी संबंधित विषयाबाबत सोबतच्या परिशिष्ट - “अ” मध्ये दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिकाऱ्यांचे निर्देश असल्यास किंवा काही अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

०३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२५१५३८४५०८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ECF4A9ABE84C70DE989C3669424C12B6CADCB583D500FE489CE8727916E0BBEE, cn=SANTOSH VITHAL ROKADE
Date: 2025.04.25 15:39:38 +05'30'

**(संतोष जया विठ्ठल रोकडे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री(पर्यटन) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री(पर्यटन) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव, पर्यटन यांचे स्वीय सहाय्यक
४. उप सचिव (पर्यटन-१), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
५. उप सचिव (पर्यटन-२), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
६. अवर सचिव (पर्यटन-१), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
७. अवर सचिव (पर्यटन-२), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
८. कक्ष अधिकारी (पर्यटन-१,२,३, व ४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
९. सर्व अधिकारी / कर्मचारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
१०. निवडनस्ती (पर्यटन-१)

**परिशिष्ट-“अ”**

**(शासन परिपत्रक,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,क्र.टीडीसी २०२५/०४/प्र.क्र.६३/पर्यटन-१, दि.२५ एप्रिल, २०२५ चे जोडपत्र)**

**********

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ९ (१) व (२) अंतर्गत पर्यटन विभागाशी (पर्यटन १,२,३ व ४) संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारित करणे.

| क्र. | विषय/कार्यासन | स्तर | | | अंतिम निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी | आदेश / प्रमाणपत्र /पत्र निर्गमित करण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | व्दितीय | तृतीय | | |
| १ | प्रादेशिक पर्यटन विकास योजनेची (RTDS) अंमलबजावणी. | क.अ./ अ.स | उ.स. | प्र.स. | मा.मंत्री (पर्यटन) | उ.स./अ.स. |
| २ | पर्यटन विकासाचे मोठे आराखडे/ विशेष प्रकल्प | अ.स | उ.स. | प्र.स. | मा.मुख्यमंत्री | उ.स./अ.स. |
| ३ | केंद्रीय अर्थसहाय्यातून राज्यातील पर्यटन स्थळांचा पर्यटनदृष्ट्या विकास करण्याबाबत (प्रसाद, स्वदेश दर्शन- १ व २) योजनांशी संबधित कार्यवाही. | क.अ./ अ.स | उ.स. | प्र.स. | मा.मंत्री (पर्यटन) | उ.स. |
| ४ | राज्यातील प्रत्येक जिल्ह्यातील युवकांना पर्यटन व आदरातिथ्य क्षेत्रातील प्रशिक्षण देऊन रोजगारक्षम बनविण्यासाठी प्रशिक्षण व क्षमता बांधणी योजना. | क.अ./ अ.स | उ.स. | प्र.स. | प्र.स. | अ.स. |
| ५ | राज्याच्या पर्यटन विकासाच्या दृष्टीने प्रसिध्दीकरीता देश विदेशातील विविध प्रदर्शने, मेळे आणि उत्सव यामधून महाराष्ट्रातील पर्यटन विषयक बाबीचे दर्शन घडविणे, थंड हवेच्या ठिकाणांचा व सुट्टी शिबीरांचा विकास. (प्रसिध्दीविषयक सर्व कामकाज) | क.अ./ अ.स | उ.स. | प्र.स. | मा.मंत्री (पर्यटन) | उ.स./अ.स. |
| ६ | धोरणात्मक बाबी (पर्यटन धोरण २०२४, साहसी पर्यटन, कृषी पर्यटन, कॅराव्हॅन पर्यटन, “आई” केंद्रीत महिला पर्यटन धोरण इ.) | अ.स | उ.स. | प्र.स. | मा.मंत्री (पर्यटन)/ मा.मुख्यमंत्री | उ.स./अ.स. |
| ७ | महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ व पर्यटन संचालनालयाशी संबंधित प्रादेशिक पर्यटन विकास योजनेविषयक (RTDS) वगळून सर्व प्रकरणे. | क.अ./ अ.स | उ.स. | प्र.स. | मा.मंत्री (पर्यटन) | उ.स./अ.स. |
| ८ | Institute of Hotel Management, दादर/सोलापूर आस्थापना आणि सेवाविषयक बाबी. | क.अ./ अ.स | उ.स. | प्र.स. | प्र.स. | अ.स. |
| ९ | न्यायालयीन प्रकरणे | क.अ./ अ.स | उ.स. | प्र.स. | प्र.स. | उ.स. |
| १० | विधानमंडळ कामकाज | क.अ./ अ.स | उ.स. | प्र.स. | मा.मंत्री (पर्यटन) | क.अ. |
| १२ | समन्वयविषयक कामकाज | क.अ. | अ.स | उ.स. | उ.स. | क.अ. |
| ११ | नागरिकांच्या तक्रारींचा निपटारा करणे, माहिती अधिकार, Online RTI Portal, Online Assembly Portal, Online आपले सरकार Portal वरील तक्रारी, विशेष कार्य कक्ष, लोकशाही दिन सुनावणी इ. | क.अ. | अ.स | उ.स. | उ.स. | क.अ. |
| १२ | इतर संकीर्ण बाबी | क.अ. | अ.स | उ.स. | उ.स. | क.अ. |